**<u>यशवंत पंचायत राज अभियान - २०१६-१७</u>**
**राज्यातील अत्युत्कृष्ट जिल्हा परिषद व पंचायत समित्या विभाग व राज्यस्तरावर पुरस्कार प्रदान करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
### शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१६/प्र.क्र.१२३/पंरा-१

बांधकाम भवन, तळमजला, २५ मर्झबान रोड, फोर्ट,
मुंबई- ४०० ००१.
तारीखः ३ एप्रिल, २०१७

**<u>वाचा-</u>**

१) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१६/प्र.क्र.१२३/पंरा-१, दिनांक १४ डिसेंबर, २०१६**
२) **शासन निर्णय क्रमांकः झेडपीए २०१६/प्र.क्र.१५५/पंरा-१, दिनांक १ मार्च, २०१७**

**शासन निर्णय-**

ग्रामीण महाराष्ट्राच्या विकासामध्ये पंचायत राज संस्थांचे योगदान मोठे आहे. राज्यामधील विकासाच्या प्रमुख योजना पंचायत राज संस्थांमार्फत राबविल्या जातात. तेव्हा पंचायत राज संस्थांना त्यांनी केलेल्या कामगिरीनुसार प्रोत्साहित करुन त्यांची कार्यक्षमता अधिक वाढविणे व त्यांच्यामध्ये उत्कृष्ट कामांची स्पर्धा निर्माण करणे आवश्यक आहे. यासाठी राज्यात पंचायत राज संस्थांचे व्यवस्थापन व विकास कार्यात अत्युत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा, पंचायत समित्या व ग्रामपंचायतींसाठी सन २००५-२००६ या आर्थिक वर्षापासून विभागस्तर व राज्यस्तरावर "यशवंत पंचायत राज अभियान" ही पुरस्कार योजना सुरु करण्यात आलेली आहे.

या विभागामार्फत राज्यातील ग्रामपंचायतींसाठी "स्मार्ट ग्राम व्हिलेज" ही योजना नव्याने राबविण्यात येत असल्याने, "यशवंत पंचायत राज अभियान" या योजनेमध्ये ग्रामपंचायती समाविष्ट न करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. पंचायत राज प्रशासन व विकास कार्यात उत्कृष्ट काम करणाऱ्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्या यांनी सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या कामाचे मूल्यमापन विचारात घेऊन विभागस्तर व राज्यस्तर अशा दोन स्तरावर "यशवंत पंचायत राज अभियान" ही अभिनव पुरस्कार योजना यावर्षी देखील राबविण्यात येत आहे. राज्यातील अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्या पुरस्कारासाठी राज्यस्तरावर निवड करण्यात येते.तसेच विभागस्तरावर तीन पंचायत समित्यांची पुरस्कारासाठी निवड करण्यात येते. सदर निवड करण्यासाठी तालुकास्तरावर, जिल्हास्तरावर, विभागस्तरावर आणि राज्यस्तरावर पारितोषिक निवड समितीची स्थापना करण्यात आलेली होती. याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १४ डिसेंबर, २०१६ अन्वये देण्यात आल्या होत्या.

विभागस्तरीय मूल्यांकन समितीने शिफारस केलेल्या प्रत्येक विभागातून प्रथम आलेल्या जिल्हा परिषदा व पंचायत समित्यांची या विभागाच्या दिनांक १४ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरून क्षेत्रिय स्तरावर पडताळणी करणे आवश्यक होते. त्यासाठी राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीच्या वतीने विभागीय आयुक्त कार्यालयांची अदला बदल करून क्षेत्रिय पडताळणी करण्याबाबतच्या सुचना विभागीय आयुक्त कार्यालयांना देण्यात आल्या होत्या. सर्व विभागीय आयुक्त कार्यालयांकडून उपरोक्त पंचायत राज सस्थांचे क्षेत्रिय पडताळणी अहवाल शासनास प्राप्त झाले आहेत.

राज्यस्तरावर अत्युत्कृष्ट पंचायत राज संस्थांची निवड करण्यासाठी राज्यस्तरीय मूल्यांकन समितीची दिनांक १७ मार्च, २०१७ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. राज्यस्तरीय पारितोषिक निवड समितीने, राज्यस्तरीय पडताळणी समितीकडून प्राप्त झालेल्या अहवालावर अभ्यास करून अत्युत्कृष्ट तीन जिल्हा परिषदा व तीन पंचायत समित्या राज्यस्तरावर व विभागस्तरावर अनुक्रमे प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या पुरस्कारासाठी पंचायत समित्यांची निवड करण्यात येत आहे.

**<u>राज्यस्तर पुरस्कार :-</u>**

अ) जिल्हा परिषद

| | | | |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा परिषद, लातूर | प्रथम पारितोषिक | रु.३०,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | जिल्हा परिषद, सोलापूर | द्वितीय पारितोषिक | रु.२०,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | जिल्हा परिषद, जळगांव | तृतीय पारितोषिक | रु.१७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

ब) पंचायत समिती

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पंचायत समिती, खानापूर विटा, जि. सांगली | प्रथम पारितोषिक | रु.२०,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | पंचायत समिती, देवगड, जि. सिंधुदुर्ग | द्वितीय पारितोषिक | रु.१७,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | पंचायत समिती, अचलपूर, जि. अमरावती | तृतीय पारितोषिक | रु.१५,००,०००/-/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

**विभागस्तर पारितोषिक :-**

अ) पंचायत समिती

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १ | **कोकण** | पंचायत समिती, देवगड, जिल्हा सिंधुदुर्ग | प्रथम पारितोषिक | रु.११,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, मालवण, जिल्हा सिंधुदुर्ग | द्वितीय पारितोषिक | रु.८,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, पनवेल, जिल्हा रायगड | तृतीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| २ | **नाशिक** | पंचायत समिती, श्रीरामपूर, जिल्हा अहमदनगर | प्रथम पारितोषिक | रु.११,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, कळवण, जिल्हा नाशिक | द्वितीय पारितोषिक | रु.८,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, राहाता, जिल्हा अहमदनगर | तृतीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ३ | **पुणे** | पंचायत समिती, खानापूर विटा, जिल्हा सांगली | प्रथम पारितोषिक | रु.११,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, मुळशी, जिल्हा पुणे | द्वितीय पारितोषिक | रु.८,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, अक्कलकोट, जिल्हा सोलापूर | तृतीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ४ | **औरंगाबाद** | पंचायत समिती, अहमदपूर, जिल्हा लातूर | प्रथम पारितोषिक | रु.११,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, अंबाजोगाई, जिल्हा बीड | द्वितीय पारितोषिक | रु.८,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, परळी, जिल्हा बीड | तृतीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| ५ | **अमरावती** | पंचायत समिती, अचलपूर, जिल्हा अमरावती | प्रथम पारितोषिक | रु.११,००,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, चांदूर रेल्वे, जिल्हा अमरावती | द्वितीय पारितोषिक | रु.८,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, दिग्रस, जिल्हा यवतमाळ | तृतीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ६ | **नागपूर** | पंचायत समिती, गोरेगांव, जिल्हा गोंदिया | प्रथम पारितोषिक (संयुक्त) | रु.९,५०,०००/-रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, भंडारा, जिल्हा भंडारा | | रु.९,५०,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |
| | | पंचायत समिती, कामठी, जिल्हा नागपूर | द्वितीय पारितोषिक | रु.६,००,०००/- रोख रक्कम, स्मृतीचिन्ह व प्रमाणपत्र |

"यशवंत पंचायत राज अभियान" कार्यक्रम गुरुवार दिनांक १३ एप्रिल, २०१७ रोजी यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, जनरल जगन्नाथराव भोसले मार्ग, मुंबई- ४०० ०२१ येथे सकाळी १०.०० वाजता सपन्न होणार आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४०३१०५३२४०१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.04.03 16:36:16 +05'30'

(रा. म. गेंगजे)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा. मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
४) मा. राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव.
६) मा. विधानसभा/ मा. विधानपरिषद सदस्य (सर्व)
७) मा. अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
७) मा. प्रधान सचिव (ग्राम विकास व पंचायत राज).
८) विभागीय आयुक्त (सर्व).
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
१०) उप सचिव/ सह सचिव (सर्व), ग्राम विकास विभाग, मुंबई.
११) निवड नस्ती, कार्यासन क्र.पंरा-१, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.